**IIश्री गणेशाय नम:II**

 **प्रेरणा स्थान** 



**तालमणी, मृदंगाचार्य कै. बाबुराव डवरी गुरुजी**

# पखवाज: शास्त्र आणि क्रियात्मक

## (Pakhawaj: Theory & Practical)

**लेखक**

**प्रा. डॉ. खिस्ते ओंकार बाळकृष्ण**

**श्री संत गजानन महाविद्यालय, खर्डा**

ता. जामखेड, जि. अहमदनगर

पखवाज: शास्त्र आणि क्रियात्मक, ISBN: 978-93-5680-354-1:- प्रा. डॉ. खिस्ते ओंकार बाळकृष्ण

**Title:** पखवाज: शास्त्र आणि क्रियात्मक

(Pakhawaj: Theory & Practical)

**Author's name:** प्रा. डॉ. खिस्ते ओंकार बाळकृष्ण (Dr. Khiste Onkar Balkrishna)

**Published by:** Self

**Publisher's address:** "Jyestharaj" Chakradhar Nagar, Pangri Road, Beed, 431122

Edition Details: I

**ISBN:** 978-93-5680-354-1

# तीर्थस्वरूप आईस समर्पित



## स्वानंदवासी सौ. मीरा बाळकृष्ण खिस्ते

## प्रस्तावना

**अदभ्र विभ्रम भ्रमद् भुजंगं श्वसद् विनिर्गमत् कडम स्फुरत् कराल भाल – हव्यवाट् धिमिद् धिमिद् धिमिद् धिमिद् ध्वनन् मृदंग तुंगमंगल ध्वनि – कडम: प्रवर्तित प्रचण्ड – ताण्डव: शिव: जयतु ।**

भारतीय संगीताचा इतिहास हा प्राचीन आहे, त्यात अनेक स्थित्यंतरे आली. काळाच्या ओघात देशा समोर जी जी परिस्थिती निर्माण झाली त्याचे साक्षीदार म्हणून वेगवेगळया वास्तू, साहित्य आणि इतर घटक साक्ष देतात या मध्ये संगीत विषयाचाही प्रामुख्याने उल्लेख करावा लागेल. कारण ज्या ज्या सत्तांनी देशावर राज्य केले त्यांच्या संस्कृतीचा परिणाम संगीत क्षेत्रावर देखील झालेला दिसून येतो उदा. बंदिश किंवा रचना यांची भाषाशैली, बोलांचे प्रचलन आणि वादनाची शैली किंवा त्याचा बाज इ.

राष्ट्र आणि स्वधर्म टिकवून ठेवण्यासाठी ज्याप्रमाणे राष्ट्र आणि धर्म रक्षक लढले, स्वातंत्र यज्ञात जीवाची, कुटुंबाची आणि सर्वस्वाची आहुती दिली, त्याच प्रमाणे संगीतोपासकांनी देखील तत्त्कालीन काळात भारतीय संगीत टिकवून ठेवण्यासाठी त्याग केला, तसेच त्यांनी अतिशय बिकट आर्थिक, सामाजिक, राजकीय परिस्थिती आणि वेगवेगळया आक्रमकांच्या काळात संगीताची उपासना, प्रचार प्रसार हा विविध मते, घराणे आणि परंपरांच्या माध्यमातून अविरतपणे चालू ठेवला. काळ आणि परिस्थिती बदलत आहे. देवाश्रय आणि राजाश्रय संपुष्टात येऊन संगीताला लोकाश्रय प्राप्त झाला. अनेक स्थित्यंतरे निर्माण होताहेत ते होणारच! तरीही वर्तमान स्थितीतही हे कार्य अविरतपणे चालूच आहे.

संगीत क्षेत्रात तबला विषयाचे अनेक ग्रंथ उपलब्ध आहेत परंतु पखवाजाच्या संदर्भात खूप कमी साहित्य उपलब्ध असताना दिसून येते, जे साहित्य उपलब्ध आहे ते मराठी भाषेत्तर आहे. पखवाज विषयाचे बरेच विद्यार्थी प्रात्यक्षिक परीक्षेत चांगले सादरीकरण करतात परंतु साहित्याच्या अभावी लेखी परीक्षेला काही प्रमाणात कमी पडतात, हीच स्थिती माझी देखील आहे. म्हणून अभ्यासाच्या दृष्टीने एकाच पुस्तकात

साहित्य उपलब्ध व्हावे यासाठी पखवाजावरील पुस्तक लिहिण्याचे शिवधनुष्य उचलण्याचा प्रयत्न केला आहे. आशा आहे कि संगीत विषाच्या विद्यार्थ्यांना याचा नक्कीच उपयोग होईल...

आज पर्यंत मला तालमणी, मृदंगाचार्य कै. बाबुराव डवरी गुरुजी, श्री. प्यारेलाल चव्हाण (डवरी) नेकनूर, प्रा. पं. श्री. गिरीशजी जोशी (अभिजात गायन साधना केंद्र, औरंगाबाद), प्रा. श्री. महेशजी कुलकर्णी (नादब्रह्म संगीत विद्यालय,बीड), प्रा. श्री. गोपाळ जाधव (लातूर), बहिण सौ. राजश्री ओंकार सेलूकर (तिरुपती) यांचे मोलाचे मार्गदर्शन लाभले.

**संगीत हि विद्या गुरुमुखी सिद्धत्वाला जाणारी कला आहे.** गुरुंच्या मार्गदर्शानात विद्यार्जन करावे. या सोबत केवळ संदर्भ म्हणून पुस्तकाचा उपयोग व्हावा हाच एकमेव उद्देश आहे. मी वादक नाही, संगीत विषयाची आवड आणि जिज्ञासा आहे, मित्र आणि विद्यार्थ्यांनी पुस्तक लेखनाचा आग्रह धरला आणि यासाठी श्री गणेशाचा आशीर्वाद तसेच वडील श्री. बाळकृष्ण लक्ष्मणराव खिस्ते, बहिण सौ. धनश्री दुर्गेशराव पत्की, पत्नी सौ. स्वाती या सर्वांच्या प्रेरणेमुळे लिखाण कार्य होऊ शकले. **कन्या द्वय शमी (मयुरी) व दुर्वा (ईश्वरी) यांच्या स्वागतार्थ हे पुस्तक ...**

आमच्या संस्थेचे सचिव मा.डॉ. महेशजी गोलेकर, श्री. विजयसिंह गोलेकर, प्राचार्य डॉ. शिवानंद जाधव आदिंनी लिखाणास प्रोत्साहन दिले तसेच ग्रंथपाल श्री. महेश बजगुडे यांनी लिखाणास पूरक साहित्य उपलब्ध करून दिले त्याबद्दल सर्वांचे आभार.

यथा बुद्धी जे काही चांगले लिहू शकलो ती गुरुकृपा. काही दोष असतील तर ते माझे.

अनावधानाने राहिलेल्या काही बाबी द्वितीय आवृत्ती मध्ये सुधारित स्वरूपात मांडण्यात येतील.

**प्रा. डॉ. खिस्ते ओंकार बाळकृष्ण**

# अनुक्रमणिका

# पखवाजाचा उगम

पखवाजच्या इतिहासाच्या संदर्भामध्ये अनेक मत मतांतरे असताना दिसून येतात. पखवाजच्या इतिहासाच्या संदर्भामध्ये विचार केला असता असे लक्षात येते की पखवाजाचा इतिहास हा फार प्राचीन नाही. पंधराव्या शतकापर्यंत कोणत्याही पुस्तकात पखवाजाचा कोणताही उल्लेख झालेला दिसून येत नाही परंतु, प्राचीन काळामध्ये मृदंग या शब्दाचा उल्लेख आढळून येतो. बऱ्याच संगीत तज्ञांच्या मते मृदंगाचे परीवर्तीत रूप म्हणजे पखवाज आहे तसेच. मृदंगाची बनावट किंवा निर्मिती ही मातीपासून झालेली दिसून येते म्हणून यास मृदा चे अंग (मृदंग) म्हणून ओळखले जाते. मृदंगाची बनावट ही मातीपासून झाल्यामुळे मृदंग वादन करत असताना बऱ्याच वेळेस रसनिर्मिती ही चरम सीमेवर असताना मातीचा मृदंग हा भंग होत असे किंवा फुटत असे यामुळे रसभंग होत होता. या वरील पर्याय म्हणून टिकाऊ अशा लाकडी भांड्यापासून तयार केलेल्या पखवाजाची निर्मिती झालेली दिसून येते. म्हणजेच पखवाजाचा निर्मितीचा आधार हा मृदंग आहे असे लक्षात येते. आचार्य भरत कालीन निर्मिती त्रिपुष्कर वाद्य हे तीन अंगा पासून तयार झालेले दिसून येते यात अंकीक, आलिंग्य आणि उर्ध्वक हे होते. यामध्ये परिवर्तन होऊन कालांतराने मृदंग आणि नंतर पखवाजाची उत्पत्ती झालेली दिसून येते. रामचरित मानस मध्ये **'बाजत ताल पखवाज, बिना'** किंवा **'ताल मृदंग अनुपा तथा घंटा घंटी पखवाज आउज'** यासारख्या पंक्तीमध्ये पखवाजाचा उल्लेख झालेला दिसून येतो. याचा अर्थ असा होतो की पखवाज हा शब्द साधारणपणे चारशे पाचशे वर्षापूर्वी प्रचलित झालेला आहे. काही ऐतिहासिक वास्तु शिल्पांचा विचार केला असता असे लक्षात येते की बऱ्याच देवी. देवतांच्या हातामध्ये पखवाज सदृश्य वाद्य कोरलेले दिसते म्हणजे दुसऱ्या बाजूने याचा अर्थ असा होतो की पखवाज वाद्य प्राचीन आहे. जरी त्यामध्ये बदल होत गेले तरी त्याचे अस्तित्व मात्र पुरातन

असताना दिसून येते. वेगवेगळ्या संगीत तज्ञांच्या मते वेगवेगळे मतप्रवाह दिसून येतात. पखवाजाचे शिरोमणी पंडित पागल दास यांच्या मते पखवाज हे वाद्य प्राचीन आहे. जरी यापूर्वी त्यास मृदंग म्हणून संबोधले जात होते तरी देखील वर्तमान स्थिती मध्ये जे पखवाजवादक आहेत त्यांना पखवाजाचार्य न म्हणता मृदंगाचार्य म्हणून संबोधले जाते या तर्का वरुन असे लक्षात येते की मृदंग हे पुरातन आहे आणि पखवाज हे वाद्य मृदंगाचे परिवर्तीत रूप आहे.

पखवाजाच्या विकासाच्या संदर्भात विचार केला असता काही तथ्ये समोर येतात. पखवाजाच्या विकासाच्या प्राथमिक अवस्थेमध्ये पखवाजाला देवाश्रय आणि राजाश्रय प्राप्त होते, त्यानंतर घराण्यांची उत्पत्ती झाली दिसून येते. देवाश्रय आणि राजाश्रयाच्या काळात कलावंत निश्चिंतपणे साधना करत होते. यानंतर वेगवेगळी घराने संगीत उपासनेच्या माध्यमातून पखवाजाच्या विकासा करिता प्रयत्नशील राहिले. यामध्ये प्रामुख्याने पं. नानासाहेब पानसे, पं. स्वामी पागल दास, पं. राजा छत्रपती सिंह, पं. कदुऊ सिंह, पं. पुरुषोत्तम दास पखवाजी, पं. गोविंदराव बऱ्हाणपूरकर, पं. बाबुराव डवरी, पं. शंकर बापू आपेगावकर यासारख्या सर्वोच्च पखवाज वादकांनी राज दरबारात संगीत साधना केली त्याबरोबरच मंदिरामध्ये भजन, किर्तन यासोबत साथ-संगत केली आणि पखवाजला लोकप्रसिद्धी दिली. वेगवेगळ्या घराण्यांचे अनेक शिष्योत्तम तयार झाले आणि तेही वर्तमान स्थितीत पखवाजाचा प्रचार-प्रसार करत आहेत.

## पखवाजाचे स्वरूप किंवा रचना:

पखवाज हे वाद्य त्याची रचना आणि स्वरूपामुळे पखवाज सदृश वाद्यापेक्षा वेगळे ठरते आणि त्यामुळे पखवाजाची रचना, पखवाजाचे बोल यामुळे पखवाजाचा बाज देखील वेगळा असताना दिसून येतो. पखवाजाचा बाज हा धीर गंभीर स्वरूपाचा असून सर्वसाधारणपणे भक्ती रस प्रधान आहे.







**बोटांची नावे**



## पखवाजाचे वर्ण किंवा बोल:

### एकल बोल

***उजव्या हाताने वाजवण्याचे बोल***

**१. ता:** ता हा बोल उजव्या हाताने करंगळी च्या साह्याने वाजविण्यात येतो. यामध्ये अनामिका, मध्यमा आणि तर्जनी हे तीनही बोट हवेमध्ये असतात. तर करंगळी आणि पंजाचा उभा भाग याचा वापर होतो. हा बोल आस युक्त आहे. ता हा बोल वाजवताना पंजा हा पूर्णपणे शायीवर असतो.

**२. ति:** उजव्या हाताच्या करंगळी, अनामिका, मध्यमा या तीन बोटाने एकत्रितपणे शायीच्या मध्यभागी दाबून आघात केला जातो. यावेळी तर्जनी ही हवेमध्ये असते.

**३. ट/र/त:** उजव्या हाताच्या तर्जनीने शायीच्या मध्यभागी दाबून आघात केला जातो यावेळी करंगळी, अनामिका, मध्यमा हि बोटे हवेत असतात.

**४. दिं/म:** वाजवताना करंगळी, अनामिका, मध्यमा आणि तर्जनी म्हणजेच पूर्ण पंजाने, पुडी वर उजव्या हाताने खुला आघात करण्यात येतो. हा स्वर खुल्या स्वरूपाचा किंवा युक्त असताना दिसून येतो.

**५. तीं:** तीं हा बोल वाजवताना अनामिका चे पहिले पेरे हे शायी वर स्थिर झालेले असते तर करंगळी, अनामिका, मध्यमा आणि तर्जनी हे हवेत असतात तर्जनीने लवेवर हलका  आणि खुला आघात करण्यात येतो.

**६. ना:** ना हा बोल वाजवताना करंगळी, मध्यमा, तर्जनी हे हवेत असतात तर अनामिका हे बोट शायीवर हलकेच स्थिर असते आणि तर्जनी द्वारे चाटेवर वर दाबून आघात करण्यात येतो.

***डाव्या हाताने वाजवण्याचे बोल***

**७. गे/घे/धु :** गे/घे/धु हा बोल वाजवताना डाव्या हाताने धूमावर खुल्या हाताने आघात करण्यात येतो.

**८. क/के/की/कत्त:** डाव्या हाताने धूमावरती चोपून आघात करण्यात येतो.

## संयुक्त बोल

**९. धा:** पुडी वर उजव्या हाताने ता वाजवून त्याच वेळेस धूमाच्या बाजूने गे किंवा घे वाजून धा हा बोल वाजवण्यात येतो.

**१०. धिं:** उजव्या हाताने पुडी वर तीं वाजून त्याच वेळेस धुमावर गे वाजले असता धिं हा बोल तयार होतो.

**११. धि:** हा बोल उजव्या हाताने पुडी वर वाजविण्यात येतो. हा बोल वाजवताना उजव्या हाताच्या पंजाचा करंगळी कडील भाग पूर्णपणे पुडी वर ठेवून तिरका उभा आघात केला जातो शायी पूर्ण झाकली जाते. याच वेळेस डाव्या हाताने धि वाजविण्यात येतो.

**१२. र:** हा बोल उजव्या हाताने पुडी वर वाजविण्यात येतो. हा बोल वाजवताना उजव्या हाताच्या पंज्याचा अंगठ्या कडील मांसल भागाचा आघात केला जातो. शायी पूर्ण झाकली जाते.

**वर दिलेल्या क्रमानुसार वेगवगळ्या बोल रचना तयार होतात.**

तिरकीट, तीटकत, किटतक, धुमकीट, घिंSतिरकीट, ताSतिरकीट, धाSतिरकीट, धिरधीर इत्यादी बोल वाजवले जातात.

# प्रकरण २. तालातील संकल्पना

संगीतामध्ये गायन वादन कलेला साथसंगत म्हणून पखवाज आणि तबला या ताल वाद्यांचे अनंन्यसाधारण महत्व असताना दिसून येते. ताल वाद्याच्या संदर्भात काही महत्वाच्या संकल्पना स्पष्ट होणे महत्वाचे आहे. यासाठी काही महत्वाच्या संकल्पना स्पष्ट केल्या आहेत. संकल्पनांच्या स्पष्टतेमुळे प्रात्यक्षिक गायन, वादन, नृत्य प्रभावी होण्यास मदत होते.

१) **संगीत :** गायन, वादन, नृत्य यांचा एकत्रित समावेश असलेल्या कलेस संगीत म्हणतात.

२) **नाद:** वस्तूवर आघात झाल्यावर ध्वनि लहरी निर्माण होतो त्यास नाद म्हणतात.

३) **स्वर:** नियमित कंपनसंख्या, उच्चनीचता, जडता आणि जाती अशा गुणधर्मांनी युक्त आणि गायन वादनास उपयुक्त ठरणाऱ्या किंवा संगीतोपयोगी ध्वनीस किंवा नादास स्वर म्हणतात.

४) **लय :** गतीच्या नियमित पुनरावृत्तीस लय असे म्हणतात. तालाच्या संदर्भात वादनाची सातत्यपूर्ण विशिष्ट गती म्हणजे लय होय. सर्वसाधारणपणे लयीचे चार प्रकार पडतात.

१) विलंबित लय - अतिशय संथ गती २) मध्य लय - मध्यम गती.

३) द्रुत लय - जलद गती. ४) अतिद्रुत लय - अतिशय जलद गती.

५) **मात्रा :** ताला मध्ये काल (वेळ) मोजण्याच्या साधनास मात्रा म्हणतात. मात्रा अंकात मोजतात. सर्व मात्रांतील कालांतर समान असणे गरजेचे असते.

६) **बोल:** पखवाजावर पुडी आणि धुम किंवा तबला डग्यावर वाजविलेल्या विविध अक्षर समूहास बोल म्हणतात.

**७) ताल:** संगीतामध्ये विशिष्ट बोल, मात्रा, सम, काल, खंड आदींनी युक्त रचनेला ताल असे म्हणतात. थोडक्यात, संगीतामध्ये कालमापनासाठी ठराविक मात्रांत नियमबद्ध स्वरुपांत केलेल्या पखवाज किंवा तबल्याच्या रचनेला ताल म्हणतात.

**८) ठेका:** तालाच्या मूळ अक्षरांना ठेका म्हणतात.

**९) सम:** तालाच्या पहिल्या मात्रेस किंवा अक्षरास सम म्हणतात.

**१०) काल:** हवेत दर्शविण्यात येणाऱ्या मात्रेस काल म्हणतात. सर्वसामान्यपणे तालाच्या उत्तरार्धात येणाऱ्या पहिल्या मात्रेस किंवा अक्षरांस काल म्हणतात. कांही तालांत काल वेगवेगळया मात्रेवर असतात.

**११) टाळी:** तालाचा ठेका किंवा बोलसमूह म्हणताना ठराविक मात्रांवर जी टाळी वाजवितात तिला टाळी असे म्हणतात. **सामान्यत: समेवर पहिली टाळी असते, तसेच काल वगळता खंडाच्या पहिल्या मात्रेवर टाळी असते.**

**१२) विभाग किंवा खंड:** सम, काल आणि टाळी यांना अनुसरून तालाचे जे वेगवेगळे भाग पडतात त्यास विभाग किंवा खंड म्हणतात. **खंडामुळे तालाची जाती आणि वजन लक्षात येते.**

**१३) आवर्तन :** तालाच्या विशिष्ट चक्राकार गतीस आवर्तन म्हणतात.

**१४) भरणा:** ठेक्याच्या मूळ अक्षरांबरोबर काही अक्षरांचा उपयोग करून किंवा मूळ बोलात थोडा बदल करून जेव्हां तालाचा ठेका वाजवितात तेव्हां त्यास भरणा म्हणतात. विलंबित लयीत ठेका वाजविताना दोन मात्रांतील कालांतर किंवा वेळ भरून काढण्यासाठी भरण्याचा उपयोग होतो. यामुळे तालाचे सौंदर्य वाढून रंजकता निर्माण होते. बऱ्याच वेळेस वादकाकडून स्वतंत्र ताल वादनात उपजत किंवा साथ संगत करताना गायन-वादनास अनुसरून भारानायुक्त ठेका वाजवण्यात येतो.

**१५) तुकडा :** तालात वाजविल्या जाणाऱ्या छोट्या मोठ्या बोल समूहास तुकडा असे म्हणतात. तुकडा हा गायन वादनात रंजकता निर्माण करून समेला जोडण्याचे कार्य करतो.

**१६) मुखडा :** सर्व सामान्यपणे मुखडा हा तालाच्या मुखापासून (समे पासून) सुरु होतो. समेपूर्वी वाजविण्यात येणाऱ्या आकर्षक बोल समूहास मुखडा असे म्हणतात.

**१७) मोहरा :** समेपासून समेपर्यंत अथवा कालापासून समेपर्यंत वाजविण्यात येणाऱ्या आकर्षक बोल समूहास मोहरा असे म्हणतात.

**१८) तिहाई :** असा बोल समूह कि जो, एका आवर्तनात तीनदां वाजवून तिसरा 'धा' वर सम येतो  त्यास तिहाई असे म्हणतात.

**१९) बराबर किंवा एकपट :** ठेक्याच्या एका मात्रेत एक मात्रा म्हटली किंवा वाजविली तर त्यास बराबर किंवा एकपट असे म्हणतात.

**२०) निमपट :** संतुलन ठेऊन दोन मात्रेत एका मात्रा म्हटली किंवा वाजविली तर त्यास निमपट म्हणतात.

**२१) सव्वापट :** संतुलन ठेऊन चार मात्रेत पाच मात्रा म्हटली किंवा वाजविली तर त्यास सव्वापट म्हणतात.

**२२) दीड पट किंवा आड लय :** संतुलन ठेऊन दोन मात्रेत तीन मात्रा म्हटली किंवा वाजविली तर त्यास दीडपट म्हणतात.

**२३) दुगून (दुप्पट) :**  संतुलन ठेऊन ठेक्याच्या एका मात्रेत दोन मात्रा म्हटली किंवा वाजविली म्हणजे त्यास दुगून किंवा दुप्पट असे म्हणतात.

**२४) तिगून किंवा तिप्पट:** संतुलन ठेऊन ठेक्याच्या एका मात्रेत तीन मात्रा म्हटली किंवा वाजविली तर त्यास तिगून किंवा तिप्पट असे म्हणतात.

**२५) चौगून किंवा चौपट:** संतुलन ठेऊन ठेक्याच्या एका मात्रेत चार मात्रा म्हटली किंवा वाजविली तर त्यास चौगून किंवा चौपट असे म्हणतात.

**२६) किस्म किंवा प्रकार:** ठेक्यातील मूळ अक्षरांचा उपयोग करून त्या सोबत  विशिष्ट बोल ठरून ठेक्याचे जे विविध प्रकार वाजवितात त्यास किस्म किंवा प्रकार असे म्हणतात.

**२७) लग्गी :** केरवा, दादरा, अद्धा किंवा दीपचंदी तालांत वाजविल्या जाणाऱ्या आकर्षक किंवा नजाकतदार बोल समूहास लग्गी म्हणतात. बऱ्याच वेळा लग्गी दुगून, चौगुन लयकारीत आणि तिचे निरनिराळे प्रकार करून वाजविली जाते. लग्गीचा उपयोग विशेष करून साथसंगतीसाठी केला जातो. लग्गी मुळे वादनात रंजकता निर्माण होऊन रस निर्मिती होते.

**२८) उठान:** ताल आवर्तनात वेगवेगळे वादन प्रकार सुरू करण्याआधी वादनास भारदस्तपणा किंवा उठाव येण्यासाठी जो आकर्षक बोलसमूह वाजवितात त्यास उठान म्हणतात. लग्गी वादन सुरू करण्यापूर्वी देखील वाजविल्या जाणाऱ्या छोट्या बोल समूहास उठान म्हटले जाते.

**२९) पलटा:** कायदा, रेल्याला जोडून मूळ कायदा किंवा रेल्यातील बोलांचाच उपयोग करून ज्या संतुलित आणि आकर्षक रचना तालाच्या स्वरुपास अनुसरून वाजविल्या जातात त्यास पलटे असे म्हणतात.

**३०) रेला:** स्वतंत्र पखवाज आणि तबला वादनात चौपट किंवा आठपट करून अतिशय तयारीत जी रचना वाजविली जाते तिला रेला म्हणतात. एका अक्षर समूहाचा ओघ आणि वेग तसेच पुडी आणि धूम तसेच तबला डग्ग्यावरील अक्षरांची आस आणि सुंदर मिलाफ ही रेल्याची वैशिष्ठ्ये आहेत. सर्वसामान्यपणे रेला हा धावत्या बोलांची नियमबद्ध रचना असते.

**३१) परण:** खुल्या बोलांची, तिहाईयुक्त आणि तालाच्या कमीत कमी दोन-तीन आवर्तनांत वाजविल्या जाणाऱ्या आकर्षक बोल रचनेला परण म्हणतात. परण या रचनेत जोरकस बोलांचा समावेश होतो.

**३२) जाती:** तालाच्या विभागात दोन मात्रांमधील कालांतराचे कमी-अधिक बोलांच्या उपयोगाने जी विशिष्ट रचना निर्माण होते त्यास जाती म्हणतात.

**अ) तिस्त्र :** सर्वसामान्यपणे तीन-तीन मात्रांच्या खंडास तिस्त्र जातीचा ताल म्हणतात **उदा.** दादरा. तसेच जाती मूळ तालाच्या एका मात्रेत ३-६-१२ मात्रा या पद्धतीने वाजविल्या जाणाऱ्या बोल समूहांच्या लयकारीस तिस्त्र जाती म्हणतात.

**ब) चतस्त्र :** सर्वसामान्यपणे चार चार मात्रांच्या खंडास चतस्त्र जातीचा ताल म्हणतात. **उदा.** तीनताल किंवा आदिताल. किंवा जाती मूळ तालाच्या एका मात्रेत ४-८-१६ मात्रा या पद्धतीने वाजविल्या जाणाऱ्या बोल समूहांच्या लयकारीस चतस्त्र जाती असे म्हणतात.

**क) मिश्र :** सर्वसामान्यपणे तालाची अशी रचना की ज्यामध्ये वेगवेगळ्या खंडात कमी अधिक मात्रांचा समावेश होतो त्यास मिश्र जातीचा ताल म्हणतात. किंवा तालातील वेगवेगळ्या मात्रेत कमी अधिक बोलांचा समावेश होतो त्यास मिश्र जाती म्हणतात. **उदा.** धमार.

**३३) लेहरा :** स्वतंत्र पखवाज आणि तबला वादनासाठी एखाद्या स्वर वाद्यावर विशिष्ट तालासाठी आणि रागामध्ये लयबद्ध स्वरसमूह सातत्यपणे किंवा चक्राकार वाजविला जातो त्यास लेहरा असे म्हणतात. लेहरा हा कालमापनाचे साधन आहे.

**३४) तालाचे दश प्राण :** ज्याप्रमाणे मानवी शरीरामध्ये वेगवेगळे अवयव आहेत या सर्वांच कार्यान्वयन हे प्राणच्या माध्यमातून होते. म्हणजेच प्राणाशिवाय शरीर हे निर्जीव आहे. प्राचीन काळातील विद्वानांनी किंवा संगीततज्ञांनी तालामध्ये १० प्राणांचा समावेश असणे महत्त्वाचे आहे असे प्रतिपादन केले आहे. यासंदर्भात नारद यांनी लिहिलेल्या **'संगीत मकरंद'** यामध्ये तालाच्या दहा प्राण यांचा उल्लेख आढळून येतो. यामध्ये **१. काळ, २. मार्ग, ३. क्रिया (सशब्द, नि: शब्द), ४. अंग, ५. ग्रह (सम ग्रह, विषम ग्रह) ६. जाती, ७. कला, ८. लय ९. यती १०. प्रस्तार** यांचा समावेश होतो. तालाच्या १० प्राणांचा उपयोग दक्षिण भारतीय म्हणजेच कर्नाटकी संगीतामध्ये विशेषत्वाने होताना दिसून येतो.

**काल:** काल या शब्दाची व्याप्ती अतिशय विस्तारित असताना दिसून येते. म्हणजे वेळ म्हणून देखील ओळखली जाते. या संकल्पने अंतर्गत श्रुष्टीच्या उत्पत्तीपासून ते अंतापर्यंत

किंवा शेवटापर्यंतचा कालावधी समाविष्ट होतो. वर्तमान स्थिती मध्ये काल मापनासाठी आपण  सेकंदा पासून ते वर्षापर्यंतचा उपयोग करतो. परंतु संगीत क्षेत्रामध्ये निमिष म्हणजेच पापणी लावण्यासाठी जेवढा कालावधी लागतो, त्याचादेखील विचार करण्यात आलेला आहे. या निमिषाचे विभाजन **कला, चतुभाग, अनुद्रुत, द्रुत, लघु, गुरु, प्लूप्त, काकपद** या भागात केलेले आहे.

**मार्ग:** तालाच्या पहिल्या मात्रे पासून ते शेवटच्या मात्रे पर्यंत जी चक्राकार अवस्था आहे त्यास मार्ग असे म्हणतात. या अंतर्गत टाळी, काल, सम, खंड या गोष्टींचा समावेश होतो. सनातनवादी संगीतज्ञ ध्रुव, चित्र, वार्तिक, आणि दक्षिण या चार मार्गाच्या प्रकारांना मानत होते.

**क्रिया:** एखादे कार्य करण्याच्या प्रक्रियेला क्रिया असे म्हणतात. **ताल वाद्यामध्ये हाताच्या आघातास किंवा एखाद्या विशिष्ट दिशेला हात दर्शवाण्याच्या पद्धतीला क्रिया असे म्हणतात.** सम किंवा ताळीही हातावर हात आघात करून दर्शविली जाते. तर काल हा हात हवेत, एक बाजूला करून  दर्शविला जातो. क्रियेचे **सशब्द** आणि **निशब्द** असे दोन प्रकार पडतात. सशब्द क्रियेमध्ये टाळी देणे यांचा समावेश होतो. याचे चार भाग आहेत **धृवा, सम्यक, ताल आणि सन्निपात.** निशब्द क्रियेमध्ये उजव्या हाताने एका बाजूला हात झुकून मात्रांचे मोजमाप होते. उदाहरणार्थ काल दाखवताना हात उजव्या बाजूला हवेत दाखवला जातो याला निशब्द क्रिया म्हणतात.

**अंग:** ज्याप्रकारे उत्तर भारतीय संगीतामध्ये ताल पद्धतित खंड वापरले जातात त्याच प्रकारे दक्षिण भारतीय संगीत पद्धतीमध्ये अंग ही संकल्पना वापरली जाते. प्रत्येक तालाचे वेगवेगळे खंड असतात. त्याच प्रकारे दक्षिण भारतीय संगीतामध्ये सहा प्रमुख अंगाचा उपयोग होतो. यामध्ये **अनुदत्त, द्रुत, लघु, गुरु, प्लूक्त, काकपद** यांचा समावेश होतो.

**ग्रह:** ज्या मात्रेपासून एखादी बंदिश सुरू होते त्या ठिकाणाला ग्रह असे म्हणतात. तालाच्या वेगवेगळया बंदिशी सर्वसामान्यपणे समेपासून सुरु होतात, तर काही रचना या कालपासून किंवा वेगवेगळ्या मात्रेपासून सुरु होतात. ग्रहांचे सर्वसामान्यपणे दोन प्रकार

पडतात यामध्ये **समग्रह** आणि **विषमग्रह** यांचा सामावेश होतो. समग्रह म्हणजे तालाच्या पहिल्या मात्रे पासून सुरु होणारी रचना होय. तर विषमग्रह म्हणजे समेपासून एखाद्या रचनेची सुरुवात न होता एखाद्या वेगळ्या मात्रेपासून रचनेची सुरुवात होते त्यास विश्रामग्रह असे म्हणतात. विषम ग्रहाचे दोन प्रकार पडतात एक म्हणजे **अतित ग्रह** आणि दुसरे म्हणजे **अनागत ग्रह.** अतीत ग्रह म्हणजे एखादी रचना सुरू झाल्यानंतर ज्यावेळेस ताल सुरू होतो, तर अनागत ग्रह म्हणजे सम येण्यापूर्वीच एखाद्या रचनेची सुरुवात होते त्यास अनागत ग्रह म्हणतात.

**जाती:** जातीवरून तालाच्या रचनेची वैशिष्ट्य लक्षात येते. खंडातील मात्रांची संख्या बदलल्यामुळे त्याचे वजन देखील बदलते. जातीचे पाच प्रकार आहेत. यामध्ये तिस्त्रजाती, चतुरस्तजाती, खंडजाती, मिश्रजाती आणि संकीर्णजाती.

**कला:** अक्षर किंवा काळाच्या विभाजनाला कला असे म्हणतात. एक अक्षर काळामध्ये किती बोल वाजवली जातात किंवा किती स्वर गायले जातात याला कला म्हणतात.

**लय:** संगीत विषयांमध्ये दोन मात्रातील अंतरास किंवा काळाच्या समान गतीला लय असे म्हणतात. ही लय दोन मात्रातील विश्रांती असते. लय संगीताचा आधार आहे. लयी चे सर्वसामान्यपणे **विलंबित लय, मध्य लय आणि द्रुत लय** असे तीन प्रकार पडतात.

**यती:** तालाची किंवा एखाद्या रचनेचा लयीनुसार जो गतीचा गुणधर्म आहे त्यास यती असे म्हणतात. यतीचे सर्वसामान्यपणे पाच प्रकार पडतात **समा यती, श्रोतागता यती, मुदुंगा यती, गोपुछां यती आणि पिपीलिका यती**.

**प्रस्तार:** तालाच्या स्वरूपानुसार वेगवेगळ्या प्रकारे विस्तार करण्यात येतो त्यास प्रस्तार असे म्हणतात. या अंतर्गत कायदा, पेशकार, रेला यांचा पलट्यांच्या आधारे विस्तार करण्यात येतो त्यास प्रस्तार असे म्हणतात.

# प्रकरण ३. ताल लिपी

तालातील बोल, मात्रा, सम, काल, खंड आणि टाळ्या यांना चिन्हांसहित लिहिणे म्हणजेच ताल लिपीबद्ध करणे होय. ताल लिपीबद्ध करण्यावरून तालाच्या प्रत्येक मात्रेतील लयकारी लक्षात येते. ताल लिपीच्या पं. भातखंडे ताल लिपी पद्धत आणि पं. पलुस्कर ताल लिपी पद्धत अशा दोन पद्धती प्रचलित असताना दिसून येतात.



**पंडित विष्णू दिगंबर पलुस्कर**
**(१८ मे १९२१ - २५ ऑक्टोबर, १९५५)**

| घटक | पं. पलुस्कर लिपी |
|---|---|
| सम | १ आकडा |
| काल | + चिन्ह |
| | उदा:<br>धा धि ना । धा तू ना ।<br>१ २ ३ । ४ ५ ६ ।<br>१ + |
| एक मात्रा | - - - - चिन्ह<br>उदा: धा धि ना । धा तू ना ।<br>१ - - \| + - - |
| विभाग | संपूर्ण ताल झाल्यावर । |
| एका मात्रेत एकाहून जास्त अक्षरे | चिन्ह नाही |
| टाळ्या | १.२.३ अंक |
| थांबायचे अंतर | S |

| | |
|---|---|
| १/२ मात्रा | धागे<br>०० |
| १/४ मात्रा | ति र की ट |
| १/८ मात्रा | ति ट क ता ग दि ग न |
| १/3 मात्रा | धातीट<br>www |
| १/६ मात्रा | धातीटतातीट<br>wwwwww<br>wwwwww |

**उदा. चौताल**

धा धा दिं ता तिट धा दिं ता तिट कता गदी गन |
- - - - ०० - - - ०० ०० ०० ००
१ × २ × ३ ४



## पंडित विष्णू नारायण भातखंडे

(१० ऑगस्ट १८६० – १९ सप्टेंबर १९३६)

| घटक | भातखंडे लिपी |
|---|---|
| सम | चिन्ह x |
| काल | चिन्ह ० |
| | उदा: धा धि ना । धा तू ना ॥<br>१ २ ३ । ४ ५ ६ ॥<br>× ० |
| एक मात्रा | मात्रे खाली आकडा लिहिणे |
| विभाग | । उभी रेघ |
| एका मात्रेत एकाहून जास्त बोल | तिरकिट |
| टाळ्या | १.२.३ अंक |
| थांबायचे अंतर | S |
| १/२ मात्रा | धाS |

**उदा. चौताल**

धा धा | दिं ता | तिट धा | दिं ता | तिट कता | गदी गन ||

× ० २ ० ३ ४

# प्रकरण ४. लय आणि लयकारी

दोन क्रियांमधील जी विश्रांती व कालांतराने होणारी त्याची पुनरावृत्ती म्हणजे लय होय. पण मात्रांच्या मध्ये कमी अधिक बोलांची रचना करून वादन केल्यास त्या वादनास एक आकर्षक रूप किंवा वजन प्राप्त होते. त्यामुळे संगीत खुलते म्हणजेच रस निर्मिती होते, त्यास लयकारी म्हणतात. नुसत्या ठेक्याने कालमापन जाते व लय सांभाळली जाते, परंतु नुसत्या ठेक्याऐवजी कमी अधिक बोलांचा ठेक्यामध्ये उपयोग केल्यास ते वादन लयकारी युक्त होते व ते प्रभावी ठरते आणि रस निर्मितीस पूरक ठरते. ठेक्याचे प्रकार, भरणायुक्त ठेका, छोटे-मोठे तुकडे, लग्गीबाज वादन करून विविध तऱ्हेने वादन, नृत्य, गायन खूप आकर्षक ठरते.

**लय:** गतीच्या सातत्यपूर्ण पुनरावृत्तीस लय असे म्हणतात. तालाच्या संदर्भात वादनाची सातत्यपूर्ण विशिष्ट गती म्हणजे लय होय. सर्वसाधारणपणे लयीचे चार प्रकार पडतात.

**१)** विलंबित लय - अतिशय संथ गती **२)** मध्य लय - मध्यम गती.

**३)** द्रुत लय - जलद गती. **४)** अतिद्रुत लय - अतिशय जलद गती.

**लयकारी:** विशिष्ट लयीच्या आधारावर किंवा विशिष्ट लय कायम ठेऊन कमी अधिक बोलांची योजना किंवा वापर करून वादन केल्यास त्या वादनास एक अलंकारिक स्वरूप प्राप्त होते. त्यामुळे संगीत खुलते त्यास लयकारी म्हणतात. **म्हणजे लय हि संकल्पना लयकारी पेक्षा विस्तारित आहे.** लय हा लयकारीचा आधार असताना लक्षात येतो.

**उदा : ताल : दादरा ठेका**

धा धि ना । धा तू ना ॥

१ २ ३| ४ ५ ६॥

× o

असा न वाजविता लयकारी युक्तपणे खालील प्रमाणे वाजवता येतो.

धातीत् धाधा धिना । धातीत् धाधा तीना ।।

× o

**सर्वसाधारणपणे प्रत्येक तालाच्या अकरा लयकारीत रूपांतर करता येते.**

**१.** दुप्पट, **२.** तिप्पट, **३.** चौपट, **४.** पाउणपट (४:३),

**५.** ३:४, **६.** कुआडी ४:५, **७.** ५:४, **८.** आडी २:३

**९.** ३:२ **१०.** बिआडी ४:७, **११.** ७:४.

**आडी, कुआडी व बिआडी या लयींच्या दुपटीस अनुक्रमे महाआडी, महाकुआडी व महाबिआडी असे संबोधले आहे.**

* **ताल लिपीबद्ध करताना आकड्यां (१,२,३...) ऐवजी बोल लिहावेत.**

**एकपट:** १ २ ३ ४ ५ ६

**दुप्पट :** १,२ ३,४ ५,६ १,२ ३,४ ५,६

**तिप्पट:** १,२,३ ४,५,६ १,२,३ ४,५,६ १,२,३ ४,५,६

**चौपट:** १,२,३,४ ५,६,१,२, ३,४,५,६,
१,२,३,४ ५,६,१,२ ३,४,५,६,

**आडलय: (३÷२ किंवा ६÷४)**

१S२ S३S ४S५ S६S

धाSधिं SनाS धाSति SनाS

**पाऊनपट: (३÷४)** १SS S२S SS३ SSS ४SS S५S SS६ SSS

**(४÷३):** १SS२ SS३S S४SS ५SS६ SSSS

**कुआड: (५÷४)** १SSS२ SSS३S SS४SS S५SSS ६SSS७

**(४÷५)** १SSS S२SS SS३S SSS४ SSSS ५SSS S६SS SS७S

**बीआड: (४÷७)** १SSS२SS S३SSS४S SS५SSS ६SSS७S

**(४÷७)** १SSS SSSS २SSS SSSS ३SSS SSSS ४SSS SSSS

# प्रकरण ५. ओळख तालांची

१. तेवरा

२. सुलताल

३. चौताल

४. धमार

५. आदिताल

६. गजझंपा

७. शिखर ताल

८. बसंत

९. रुद्र

१०. मत्तताल

११. गणेश ताल

**धमार ताल धमार** गायनासाठी, तर इतर तालांचा उपयोग धृपद, स्वतंत्र पखवाज वादन तसेच स्वर वाद्यांच्या साथ संगतीस होतो.

## १. तेवरा ताल

मात्रा: ७ खंड: ३ सम: १ ल्या मात्रेवर काल: नाही

टाळी: ४, ६ व्या मात्रेवर

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| **पं. पलुस्कर लिपी** | धा | दिं | ता | तिट | कता | गदी | गन \| |
| | - | - | - | ०० | ०० | ०० | ०० |
| | १ | | | २ | | ३ | |
| **पं. भातखंडे लिपी** | धा | दिं | ता \| | तिट | कता \| | गदी | गन \|\| |
| | × | | | २ | | ३ | |

## २. सुलताल

मात्रा: १०, खंड: ५, सम: १, काल: ३,९ मात्रेवर टाळी: १, ५, ७ मात्रेवर

| धा धा\| | दिं ता\| | तिट धा\| | तिट कता\| | गदी गन\|\| |
|---|---|---|---|---|
| × | ० | २ | ३ | ० |

## ३. चौताल ताल

मात्रा: १२ खंड: ६ सम:१ मात्रेवर, काल: ३, ७ मात्रेवर, टाळी: ५, ९, ११ मात्रेवर

| धा धा\| | दिं ता\| | तिट धा\| | दिं ता\| | तिट कता\| | गदी गन\|\| |
|---|---|---|---|---|---|
| × | ० | २ | ० | ३ | ४ |

**४. धमार ताल** मात्रा: १४, खंड: ४, सम:१ मात्रेवर, काल:८ मात्रेवर, टाळी: ६, ११ मात्रेवर

| क | धि | ट | धि | ट\| | धा | S\| | क | ति | ट\| | ति | ट | ता | S\|\| |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| × | | | | | २ | | ० | | | ३ | | | |

## ५. आदिताल

मात्रा: १६ खंड: ४ सम: १ मात्रेवर, काल: ९ मात्रेवर, टाळी: ५, १३ मात्रेवर

| धा | धिट | धिट | धा\| | धा | धिट | धिट | धा\| | कत् | तिट | तिट | ता\| | तिट | कता\| | गदी | गन\|\| |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| × | | | | २ | | | | ० | | | | ३ | | | |

**६. गजझंपा ताल** मात्रा: १५ खंड:४ सम:१ मात्रेवर

काल:९ मात्रेवर टाळी: १, ५, १२ मात्रेवर

| धा | धिं | नक | तक। | धा | धिं | नक | तक। | तिं | नक | तक। | तिट | कता | गदी | गन॥ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| × | | | | २ | | | | ० | | | ३ | | | |

## ७. शिखर ताल

मात्रा: १५ खंड:५ सम: १ मात्रेवर काल: नाही, टाळी:

१, ५, ९, १२, १४ मात्रेवर

| धा | त्रक | धिं | नक। | थुं | गा | धिं | नक। | धुम | किट | तक। | धेत | धा। | तिट | कता | गदी | गन॥ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| × | | | | २ | | | | ३ | | | ४ | | ५ | | | |

## ८. बसंत ताल

मात्रा: ९ खंड: ९ सम: १ काल: ५, ७, ९ मात्रेवर

टाळी:१, २, ३, ४, ८ मात्रेवर

| धा | दिं | ता | धेत | ता | तिट | कत | गदी | गन ‖ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| × | २ | ३ | ४ | ० | ५ | ० | ६ | ० |

## ९. रुद्र ताल

मात्रा: ११ खंड: ११ सम:१ मात्रेवर, काल: २, ६, ११ मात्रेवर, टाळी: १, ३, ४, ५, ७, ८, ९, १० मात्रेवर

| धा | तत्त | धा | तिरकिट | धि | ना | तिरकिट | तू | ना | कत्त | ता |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| × | ० | २ | ३ | ४ | ० | ५ | ६ | ७ | ८ | ० |

## १०. मत्तताल

मात्रा: १८ खंड: ९ सम:१ मात्रेवर, काल: २, ६, ११ मात्रेवर, टाळी: १, ३, ४, ५, ७, ८, ९, १० मात्रेवर

| धा Sǀ | घी डǀ | न गǀ | घी डǀ | न गǀ | ति टǀ | क तǀ | ग दिǀ | ग नǁ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| × | ० | २ | ३ | ० | ४ | ५ | ६ | ० |

## ११. गणेश ताल

मात्रा: १८ खंड: ५ सम:१ मात्रेवर, काल: १५ मात्रेवर, टाळी: १, ३, ४, ५, ७, ८, ९, १० मात्रेवर

| धा S धि टǀ | धि ट धा Sǀ | धा S कि टǀ | त कǀ | ग दि ग नǁ |
|---|---|---|---|---|
| × | २ | ३ | ० | ४ |

# ताल विस्तार

चिन्ह टायपिंग अडथळ्यामुळे तालांच्या रचनेत केवळ खंडाच्या चिन्हाचा वापर केला आहे, **मुळ ताल टाईप करताना सर्व चिन्हे वापरली आहेत**, यास अनुसरून ताल किंवा तालातील एखादी रचना लिहिताना प्रत्येक आवर्तनास सर्व चिन्हे लिहावीत.

## ताल: तेवरा

| धा | दिं | ता \| | तिट | कता\| | गदी | गन \|\| |
|---|---|---|---|---|---|---|
| × | | | २ | | ३ | |

**प्रकार /किस्मे**

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| धा | दिं | ऽता \| | तिट | कता\| | गदी | गन \|\| |
| धा | दिंदिं | ता \| | तिट | कता\| | तिटकता | गदीगन \|\| |
| धा | दिं | ऽता \| | ऽधा | ऽता\| | तिटकता | गदीगन \|\| |
| धा | दिंदिंदिं | ता \| | तिट | कता\| | गदी | गन \|\| |
| धा | दिं दिं | ता \| | तिट | कता\| | गदी | गन \|\| |

**उठान**

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| धागेतिट | तागेतिट | कडधातिट \| | धागेतिट | कडधेत्तान \| | धा | धातिरकीटताS \|\| |
| धीटधीट | कत्धा | न्धान\| | धाधा | धीटधीट \| | धागेतिट | कड्धातिट \| |
| कत्धा | न्धान | धाकत् \| | धान्धान\| | धाकत् \| | धान्धान | धाकत् \|\| |
| घेघे | तिटतिट | धागेतिट \| | तागेतिट | कडधेत्तान \| | धा | धाSतिरकिटतक\| |
| तक्डाँ | धा | धाSतिरकिटतक\| | तक्डाँ | धा\| | धाSतिरकिटतक | तक्डाँ \|\| |

**परण**

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| धीटधीट | कडधातिट | कडधातिट \| | कडधातिट | धागेतिट\| | कड्धेत्तिरकिट | कड्धेत्तिरकिट\| |
| कड्धेत्तिरकिट | कत्धातिर | किटतक \| | तक्डाँ | धात्\| | क्डाँधा | त्क्डाँ\|\| |
| धागेतिट | गदिगन | नगतिट \| | गदिगन | धागेतिट\| | तागेतिट | गदिगन\|\| |
| धीटधीट | धागेतिट | गदिगन \| | नगतिट | कड्धातिट \| | धागेतिट | गदिगन \| |
| नगतिट | कड्धातिट | गदिगन\| | धा | गदिगन | धा | गदिगन \|\| |

## फरमाईश चक्रदार

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| दिंदिं | तिटतिट | धागेतिट \| | तागेतिट | कडधातिट \| | धागेतिट | कतधा \| |
| कताऽन | धा | धाधा \| | कत्धा | कतधा \| | कताऽन | धा \| |
| धाधा | कत्धा | कतधा \| | कताऽन | धा \| | धाधा | कत्धा \| |
| दिंदिं | तिटतिट | धागेतिट \| | तागेतिट | कडधातिट \| | धागेतिट | कतधा \| |
| कताऽन | धा | धाधा \| | कत्धा | कतधा \| | कताऽन | धा \| |
| धाधा | कत्धा | कतधा \| | कताऽन | धा \| | धाधा | कत्धा \| |
| दिंदिं | तिटतिट | धागेतिट \| | तागेतिट | कडधातिट \| | धागेतिट | कतधा \| |
| कताऽन | धा | धाधा\| | कत्धा | कतधा\| | कताऽन | धा\| |
| धाधा | कत्धा | कतधा\| | कताऽन | धा\| | धाधा | कत्धा\|\| |

## रेला

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| धागेतिट | तागेतिट | धागेतिट \| | नागेतिट | गदिगन \| | नागेतिट | गदिगन \| |
| धागेतिटतागेतिट | धागेतिटनागेतिट | गदिगननागेतिट\| | गदिगनधागेतिट | गदिगनधागेतिट\| | गदिगननागेतिट | नागेतिटगदिगन\|\| |

**विस्तार:.**

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| धागेतिटतागेतिट | धागेतिटगदिगन | नागेतिटगदिगन\| | गदिगननागेतिट | धागेतिटतागेतिट\| | गदिगननागेतिट | गदिगनगदिगन\|\| |
| धागेतिटगदिगन | धागेतिटतागेतिट | गदिगननागेतिट\| | घींऽतिरकिटतक | ताऽतिरकिटतक\| | घींऽतिरकिटतक | ताऽतिरकिटतक\|\| |
| नागेतिटगदिगन | नागेतिटगदिगन | नागेतिटगदिगन\| | नागेतिटगदिगन | नागेतिटगदिगन\| | नागेतिटगदिगन | नागेतिटगदिगन\|\| |
| धागेतिटगदिगन | धागेतिटगदिगन | धागेतिटगदिगन\| | धागेतिटगदिगन | धागेतिटगदिगन\| | धागेतिटगदिगन | धागेतिटगदिगन\|\| |
| नागेतिटगदिगन | नागेतिटगदिगन | नागेतिटनागेतिट\| | नागेतिटगदिगन | गदिगननागेतिट\| | नागेतिटगदिगन | गदिगननागेतिट\|\| |
| धाऽतिटगदिगन | नागेतिटगदिगन | धाऽतिटगदिगन\| | धाऽतिटगदिगन | नागेतिटनागेतिट\| | धाऽतिटगदिगन | नागेतिटनागेतिट\| |
| नागेतिटगदिगन | धाऽऽऽ | नागेतिटनागेतिट | नागेतिटगदिगन | धाऽऽऽ\| | नागेतिटनागेतिट | नागेतिटगदिगन\|\| |

**तिहाई:.**

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| धागेतिटगदिगन | तागेतिटगदिगन | धाऽधागेतिट | गदिगनतागेतिट | गदिगनधाऽ\| | धागेतिटगदिगन | तागेतिटगदिगन\|\| |

## तुकडा

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| धीटधीट | धागेतिट | कडधातिट \| | धागेतिट | कतिटत \| | गेनधेत्त | धागेतिट \| |
| तागेSन | धाता | धातागे \| | Sनधा | ताधा \| | तागेSन | धाता \|\| |
| धीटधीट | धागेतिट | कडधातिट \| | धागेतिट | गदिगन \| | नागेतिट | कडधातिट\| |
| धागेतिट | धा | कडधातिट \| | धागेतिट | धा \| | कडधातिट | धागेतिट\|\| |
| दिंदिं | तिटतिट | धागेतिट \| | तागेतिट | कडधेत्तान \| | धा | धाSतिरकिटतक \| |
| तक्डाँ | धा | धाSतिरकिटतक\| | तक्डाँ | धा \| | धाSतिरकिटतक | तक्डाँ \|\| |

# ताल: आदीताल

| धा | धिट | धिट | धा\| | धा | धिट | धिट | धा\| | कत् | तिट | तिट | ता\| | तिट | कता | गदी | गन\|\| |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| × | | | | २ | | | | ० | | | | ३ | | | |

**उठान**

| | | | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| धीटधीट | कत्धा | न्धान | धाधा\| | धीटधीट | धागेतिट | कड्धातिट | धागेतिट\| | कत्धा | न्धान | धा | कत्ता\| | न्तान | ता | कत्धा | न्धान\| |
| कत्धा | न्धान | धा | कत्ता\| | न्तान | ता | कत्धा | न्धान\| | कत्धा | न्धान | धा | कत्ता\| | न्तान | ता | कत्धा | न्धान\|\| |
| धीटधीट | धागेतिट | गदीगन | नागेतिट\| | तकीटत | तिटकता | घेघेतीट | कताSन\| | कताSन | धाधा | धाSSS | कताSन\| | धाधा | धाSSS | कताSन | धाधा\|\| |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| धेत्तधेत्त | त्तात्रक | धेत्तधेत्त | त्तात्रक\| | धेत्तधेत्त | त्तात्रक | धेत्तधेत्त | त्तात्रक\| |
| धेत्तSघे | SSधेत्त | तात्रक | धेत्तSघे\| | SSधेत्त | तात्रक | धेत्तघे | SSधेत्त\|\| |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| धा | धीट | धीट | धा\| | कत्ता | घींघीं | धाघीं | घींधा\| |
| दिंतिटतिट | दिंता | तिटतिटतिट | दिंता\| | कित्ता | धातिटकताघीं | नकधातिट | किटघिनता\|\| |

**परण**

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| धागेतिट | धागेतिट | तागेतिट | तागेतिट। | कडधातिट | धागेतिट | गदीगन | नागेतिट। |
| कतीटता | गीनधा | तिटकता | गदीगन। | धाSSS | गदीगन | धाSSS | गदीगन ॥ |
| धागेतिट | तागेतिट | धागेतिट | तागेतिट। | कडधातिट | धागेतिट | गदीगन | नागेतिट। |
| तकीटत | गीनधा | तिटकता | गदीगन। | धागेतिट | कताSन | कतीटता | गदीगन॥ |
| धागेतिट | गदीगन | धाSSS | धागेतिट। | कताSन | कतीटता | गदीगन | धागेतिट। |
| गदीगन | धाSSS | धागेतिट | कताSन। | कतीटता | गदीगन | धागेतिट | कताSन॥ |
| धीटधीट | धागेतिट | गदीगन | नागेतिट। | कताSन | धीत्ता | तिटकता | गदीगन। |
| धागेतिट | कताSन | कतीटता | कताकता। | कतीटता | कताकता | कतीटता | गदीगन। |
| धाSSS | कताSन | कतीटता | कताकता। | कतीटता | कताकता | कतीटता | गदीगन। |
| धाSSS | कताSन | कतीटता | कताकता। | कतीटता | कताकता | कतीटता | गदीगन ॥ |
| धाSन | धीकीट | कतीट | ताSन । | तिट | कडधाSन | धादींता | कत। |
| धाSS | आSS | धादींता | धाSS। | आSS | धादींता | कत | धाSS ॥ |
| धागेतिट | तागेतिट | कडधातिट | धागेतिट। | कतीटता | गीनधागे | तिटकता | गदीगन |
| तिरकीटतकताS | तिटकतागदीगन | धाधा | तिरकीटतकताS। | तिटकतागदीगन | धाधा | तिरकीटतकताS | तिटकतागदीगन॥ |

**झुलणा परण (डगमगती लय)**

धागेन धागेतिट तागेन तागेतिट| कडधेत्त धागेतिट कड्धातिट धागेतिट| कत्धा न्धान धा कत्ता| न्तान ता कत्धा न्धान|
कत्धा न्धान धा कत्ता| न्तान ता कत्धा न्धान| कत्धा न्धान धा कत्ता| न्तान ता कत्धा न्धान||

**फर्माईश चक्रदार,** रचना. लालजी श्रीवास्तव

नानाना नगतिरकिट कतेटेतेटे कतागदिगन| तेटेकताSन किटधेSता कतीSघेन नाSकिटतक|
धातिरकिटधिकिट कताकताकता घेनानड़ाSन धाSकत| दींगिड़धाती धाकतदींगिड़ धातीधकत दींगिड़दाती|
धाSकत दींगिड़धाती धातकदींगिड़ धातीधकत| दींगिड़दाती धाSकत दींगिड़धाती धाकतदींगिड़|
धातीधकत दींगिड़दाती धा नानाना| नगतिरकिट कततेतेटे कतागदिगन तेटेकताSन|
किटधेSता कत्तीSघेन नाSकिटतक धातिरकिटधिकिट| कताकताकता घेननड़ाSन धाSकत दींगिधाती|
धातकदीगिड़ धाSकत दींगिधाती धाSकत| दींगिधाती धातकदीगिड़ धाSकत दींगिधाती|
धाSकत दींगिधाती धातकदीगिड़ धाSकत| दींगिधाती धा नानाना नगतिरकिट|
कततेतेटे कतागदिगन तेटेकताSन किटधेSता| कत्तीSघेन नाSकिटतक धातिरकिटधिकिट कताकताकता|
घेननड़ाSन धाSकत दींगिधाती धातकदीगिड़| धाSकत दींगिधाती दींगिधाती धाSकत|
दींगिधाती धाकतदींगिड़ धातीधाकत दींगिड़धाती| धाSकत दींगिधाती धाकतदींगिड़ धातीधाकत||

**चक्रदार**

(धाSन धिकिट धात्रक धिकिट कडधेत्त धिकिट दिनदि नाSSS

कत्तिट घेधेतीट धात्रक धिकीटकत् घींSतीरकीटतकताS घींSतीरकिटतक ताSSS घींSतीरकीटतक

ताSSS घींSतीरकीटतक ताSSS घींSतीरकीटतक ताSSS घींSतीरकीतटकत ताSSS घींSतीरकीटतकताS

घींSतीरकटतक ताSSS घींSतीरकीटकता) × 3

## रेला

धातिरकिटतकताS धाSतिरकिटतक धिरधीरकिटतक ताSतिरकिटतक| धातिरकिटतकताS धिरधीरकिटतक धिरधीरकिटतक ताSतिरकिटतक|

ताSतिरकिटतक तिरतिरकिटतक तिरतिरकिटतक ताSतिरकिटतक| धातिरकिटतकताS धिरधीरकिटतक धिरधीरकिटतक ताSतिरकिटतक||

धातिरकिटतकताS धिरधीरकिटतक धातिरकिटतकताs धिरधीरकिटतक| धातिरकिटतकताS धिरधीरकिटतक धातिरकिटतकताS धिरधीरकिटतक|

ताSतिरकिटतक तिरतिरकिटतक ताSतिरकिटतक तिरतिरकिटतक| तातिरकिटतकताS धिरधीरकिटतक धातिरकिटतकताS धिरधीरकिटतक||

धातिरकिटतकताS ताSतिरकिटतकताS धातिरकिटतकताS ताSतिरकिटतकताs| धातिरकिटतकताS धिरधीरकिटतक धातिरकिटतकताS धिरधीरकिटतक|

ताSतिरकिटतकताS धातिरकिटतकताS ताSतिरकिटतकताS धातिरकिटतकताS धातिरकिटतकताS धिरधीरकिटतक धातिरकिटतकताS धिरधीरकिटतक|

## तिहाई

धातिरकिटतकताS धिरधीरकिटतक धातिरकिटतकताs धिरधीरकिटतक| धाSS SSSS धातिरकिटतकताS धिरधीरकिटतक

धातिरकिटतकताs धिरधीरकिटतक| धाSS SSSS | धातिरकिटतकताS धिरधीरकिटतक धातिरकिटतकताs धिरधीरकिटतक||

## ताल: चौताल

| धा | धा\| | दिं | ता\| | तिट | धा\| | दिं | ता\| | तिट | कता\| | गदी | गन\|\| |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| × | | ० | | १ | | ० | | २ | | ३ | |

## प्रकार /किस्मे

| | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| धा | धा\| | दिंदिं | ता\| | तिटतिट | धाता\| | दिंदिं | ता\| | तिट | कता\| | तिटकता | गदीगन\|\| |
| धा | धा\| | दिंदिंदिं | ता\| | तिटतिट | धाता\| | दिंदिंदिं | ता\| | तिट | कता\| | गदी | गन\|\| |
| धा | धाधाधा\| | दिंदिंदिं | ताताता\| | तिट | धाधाधा\| | दिंदिंदिं | ताताता\| | तिट | कता\| | गदी | गन\|\| |
| धा | Sधा\| | Sदिं | Sता\| | तिट | Sधा\| | दिं | ता\| | तिट | कता\| | गदी | गन\|\| |
| धा | धाधा\| | दिं | ता\| | तिट | धाधा\| | दिं | ता\| | तिट | कता\| | गदी | गन\|\| |

